**चांदेगाव साठवण तलाव ता. उदगीर जि. लातूर, या योजनेस सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लपात २११४( ०८/१४)/२०१४ लपा-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रूवारी, २०१५

पहावे

**१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. गोमपाविम/तां-४/सुप्रमा/२७१ दि. १६.०१.२०१४ व क्र. ४७२८ दि. ०६.०१.२०१४**
**२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्ययस-२०१४/प्रक्र१९९/अर्थ-२ दिनांक १ जानेवारी, २०१५.**

प्रस्तावना

कार्यकारी संचालक गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे आदेश क्र. गोमपाविम/प्रमा/ता-४/चांदेगाव सात/८/२००७ दिनांक ०७.०७.२००७ अन्वये एकूण रु. ११५०.७७ लक्षच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००६-२००७ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

आता या निर्णयान्वये चांदेगाव साठवण तलाव ता. उदगीर जि. लातूर, या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये १८७१.७९ लक्ष (रु. अठरा कोटी, एक्काहत्तर लक्ष, एकोणऐंशी हजार, फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठीची एकूण तरतूद रूपये १७५३.०८ लक्ष (रू. सतरा कोटी, त्रेपन्न लक्ष, आठ हजार फक्त) व अनुषंगीक खर्चासाठी एकूण तरतूद रूपये ११८.७१० लक्ष (रू. एक कोटी, अठरा लक्ष, एकाहत्तर हजार, फक्त) आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २०११-२०१२ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २१ ऑगस्ट, २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तात नमुद केल्यानुसार "सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या प्रकल्पासाठी तरतूद उपलब्ध करून दिली जाणार नाही. तत्पूर्वी काम पूर्ण करावे." या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग), (४७०२ ४९९ २)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ६५/१४३४, दि. १९.०३.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि. २१ ऑगस्ट, २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (७५/२०१५) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५१६१४१६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.12 15:25:31 +05'30'

**(रा.बा. क्षीरसागर)**

शासनाचे अवर सचिव

सहपत्र-परिशिष्ट अ

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, लातूर.
९. अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ.
१०.कार्यकारी अभियंता, लातूर मध्यम प्रकल्प विभाग, लातूर.
११.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१४.लपा-२, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

## शासन निर्णय क्रमांक : लपात २११४( ०८/१४)/२०१४ लपा-२, दि. ०५.०२.२०१५

## चांदेगाव साठवण तलाव ता. उदगीर, जि. लातूर

## उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | २.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ५६५.९६ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ११६८.०२ |
| ४ | “डी” विमोचक | ०.०० |
| ५ | 'के' इमारत | १.०० |
| ६ | "एम" वृक्षरोपन | ०.१० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ०.५ |
| ८ | 'पी' दुरुस्ती | ०.५ |
| ९ | 'आर' दळणवळण | १५.०० |
| | **एकुण** | **१७५३.०८** |
| | **आनुषंगिक खर्च** | **११८.७१** |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | **१८७१.७९** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र ७५६ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ४५२८.७० सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ४१३३२/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.१९ > १